**नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांचा बँकीग व्यवहार व त्यांच्याकडील अतिरिक्त निधी गुंतवणूकीबाबत सूचना.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१४/नवि-०४**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १९ जुलै, २०२४.

संदर्भ : १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.शासाऊ-१०.१५/प्र.क्र.४२/सा.ऊ., दिनांक २७ ऑक्टोबर, २०१५.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.५१/२०/कोषा-प्रशा ५, दिनांक १३ मार्च, २०२०, दिनांक १३ ऑगस्ट, २०२०, दिनांक ०३ मार्च, २०२१, दिनांक २० मे, २०२१, दिनांक ०९ डिसेंबर, २०२१, दिनांक ०७ डिसेंबर, २०२२.
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.८४/कोषा-प्रशा ५, दिनांक २२ नोव्हेंबर, २०२३.
४) नगर विकास विभाग, शासन परिपत्रक क्र.लोलेस-२०१६/प्र.क्र.८७०/नवि-३१, दिनांक ०२ मार्च, २०१७.
५) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.लोलेस-२०१९/प्र.क्र.४८/नवि-०४, दिनांक २८ मे, २०१९.
६) नगर विकास विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.१४/नवि-०४, दिनांक १४ फेब्रुवारी, २०२४.

**प्रस्तावना :-**

शासकीय कार्यालयांच्या बँकिंगविषयक व्यवहारांसाठी आणि सार्वजनिक उपक्रम / महामंडळ यांच्या बँकिंगविषयक व्यवहारांसाठी व त्यांच्याकडील अतिरिक्त निधीच्या गुंतवणुकीसाठी राष्ट्रीयकृत बँकां, आयडीबीआय बँक यांना तसेच विहित अटींची पूर्तता केल्याने खाजगी बँका व सहकारी बँक यांना संदर्भ क्र. १ ते ३ येथील शासन निर्णयान्वये पात्र ठरविण्यात आले आहे.

महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम १९४९ व महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक क्षेत्रे अधिनियम १९६५ च्या विविध कलमांमध्ये नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडील निधी / शिल्लक / अतिरिक्त निधीच्या गुंतवणुकीबाबत तरतूद विहीत करण्यात आली आहे. तसेच, प्रस्तुत तरतूदी व मा.लोकलेखा समितीच्या शिफारशी विचारात घेऊन नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना केंद्र किंवा राज्य शासनाच्या योजनेमधून अथवा राज्य शासनाच्या विविध विकास विषयक कार्यक्रमांसाठी राज्य शासनाकडून वितरीत करण्यात येणाऱ्या निधीबाबत व त्यांच्याकडील अतिरिक्त निधीच्या गुंतवणुकीबाबत सूचना संदर्भाकित अ.क्र. (४) व (५) अन्वये देण्यात आल्या आहेत. तसेच संदर्भ क्र.३ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयाच्या अनुषंगाने राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना त्यांच्या बँकिंगविषयक व्यवहारांसाठी व त्यांच्याकडील अतिरिक्त निधीच्या गुंतवणुकीबाबत संदर्भ क्र.६ अन्वये सूचना देण्यात आल्या आहेत.

शासकीय बँकींग व्यवहार तसेच अतिरिक्त निधी गुंतवणूकीबाबत वित्त विभाग व नगर विकास विभागाच्या संदर्भाधिन सूचनांनुसार नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडून कार्यवाही होत नसल्याचे / त्यांच्याकडून प्रतिसाद मिळत नसल्याची बाब काही बँकांकडून शासनाच्या निदर्शनास आणण्यात आली आहे.

शासकीय बँकींग व्यवहार तसेच अतिरिक्त निधी गुंतवणूकीबाबत वित्त विभाग तसेच नगर विकास विभागाने वेळोवेळी दिलेल्या सूचना विचारात घेऊन त्याबाबत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना सर्वसमावेशक सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :-**

१. महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम १९४९ च्या कलम ८३ व ९२ तसेच महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक क्षेत्रे अधिनियम १९६५ च्या कलम ९०अ, ९०ब व ९९ तरतूदी, संदर्भाधिन क्र.१ ते ६ येथील सूचना व त्यामध्ये विहित केलेल्या अटी व शर्तीनुसार नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांबाबत पुढीलप्रमाणे पुन्हा सूचना देण्यात येत आहेत :-

  I. शासकीय कार्यालयांच्या बँकिंगविषयक व्यवहारांसाठी आणि सार्वजनिक उपक्रम / महामंडळ यांच्या बँकिंगविषयक व्यवहारांसाठी व त्यांच्याकडील अतिरिक्त निधीच्या गुंतवणुकीसाठी राष्ट्रीयकृत बँकां, आयडीबीआय बँक तसेच विहित अटींची पूर्तता केल्याने खाजगी बँका व सहकारी बँक यांना संदर्भ क्र.१ ते ३ अन्वये पात्र केले आहे. सदर मार्गदर्शक सूचना व त्यातील अटी व शर्ती, राज्यातील सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना त्यांच्या बँकीग व्यवहारासाठी व त्यांच्याकडील अतिरिक्त निधीच्या गुंतवणुकीसाठी लागू राहतील.

  II. बँकींग विषयक व्यवहारांच्यासंदर्भात सदर बँकांमधून एका बँकेची निवड करताना संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांनी संदर्भाकित क्र.१ ते ६ मधील सर्व निकषांची पूर्तता होत असल्याची खात्री करुनच जाणीवपूर्वक निर्णय घ्यावा.

  III. प्रस्तुत विषयाबाबत भविष्यात वित्त विभागाकडून अधीक बँकांचा समावेश अथवा काही बँक वगळल्या गेल्यास त्यासंदर्भातील सूचनां, अटी व शर्ती राज्यातील नागरी स्थनिक स्वराज्य संस्थांना त्याप्रमाणात / मर्यादेत लागू राहतील.

  IV. अशा अतिरिक्त निधीच्या गुंतवणुकीबाबतचे अधिकार हे महानगरपालिका/नगरपरिषदा अधिनियमामध्ये विहीत केल्यानुसार राहतील.

२. नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या अतिरिक्त निधीच्या गुंतवणुकीमधून संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचे आर्थिक नुकसान होऊ नये याची दक्षता घेण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित आयुक्त, महानगरपालिका व मुख्याधिकारी, नगरपरिषद/नगरपंचायत यांची राहील.

३. प्रस्तुत शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२४०७१९१४१४०३९३२५ असा आहे. प्रस्तुत शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHRIKANT CHANDRAKANT ANDGE

Digitally signed by SHRIKANT CHANDRAKANT ANDGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D8D9626C9E038380CD235C048F20D7CE74CFFD3A95F2AC3C192E9C991F358271, cn=SHRIKANT CHANDRAKANT ANDGE
Date: 2024.07.19 14:25:55 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री, यांचे अपर मुख्य सचिव
२. मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई

३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. सर्व विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक, नगरपालिका प्रशासन.
५. आयुक्त व संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
६. संचालक, नगर रचना, नगर रचना संचालनालय, पुणे.
७. सह आयुक्त, नगरपालिका प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
८. महालेखापाल कार्यालय, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०. सर्व जिल्हाधिकारी
११. आयुक्त, सर्व महानगरपालिका
१२. सर्व उप / सहायक संचालक, नगररचना
१३. मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषदा/ नगरपंचायती
१४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१५. प्रधान सचिव, नगर विकास-१ विभाग यांचे स्वीय सहायक,मंत्रालय, मुंबई
१६. प्रधान सचिव,नगर विकास-२, यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई
१७. सर्व सह सचिव / उप सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. सर्व अवर सचिव / कक्ष अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. निवडनस्ती, नवि-४ कार्यासन , नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.